# महाराष्ट्र शासन
# गृह विभाग

**शासन ज्ञापन क्रमांक दुरूस्ती-१०१८/प्र.क्र.३८५/पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.

दिनांक २६ नोव्हेंबर २०१८.

**विषय** :- पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या अधिपत्याखालील पोलीस उप आयुक्त, परिमंडळ-१, यांच्या कार्यालयाच्या इमारतीची दुरूस्ती व नूतनीकरण करण्यासाठी प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.

**संदर्भ** :-
१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/ प्र.क्र.४९/ १४/ विनियम, दिनांक ०५.०१.२०१५.
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/ १३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.
३) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. पोआ/ कक्ष-८(१)/ शा.२३१/२०१८, दिनांक २५.०९.२०१८.

**ज्ञापन.-**

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या कार्यालयाने पोलीस उप आयुक्त, परिमंडळ-१, यांच्या कार्यालयाच्या इमारतीची दुरूस्ती व नूतनीकरण करण्यासाठी प्रशासकीय मान्यता मिळणेबाबतचा प्रस्ताव सादर केला आहे.

**२.** उक्त कामासाठी उप विभागीय अभियंता, मध्य (सा.बां.) उपविभाग, मुंबई, यांनी सन २०१७-१८ च्या राज्य दरसूचीनुसार तयार केलेले एकूण रु.९४,३८,९४०/- इतक्या खर्चाचे अंदाज सादर केले असून ते कार्यकारी अभियंता, इलाखा शहर (सा.बां.) विभाग, मुंबई, यांनी साक्षांकित केले आहेत.

**३.** उक्त खर्चाचे अंदाज हे सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी तपासले आहेत व खालील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे एकूण रु.९४,३८,९४०/- इतक्या खर्चाच्या अंदाजास प्रशासकीय मान्यता देण्यास, विवक्षित अटींवर, सहमती दिली आहे:-

| अ.क्र. (१) | कामाचे नाव (२) | खर्चाचे अंदाज *(सा.बां. विभाग, मंत्रालयाने सुधारित केलेले)* (३) |
|---|---|---|
| १. | *"Renovation and up-gradation of D.C.P., Zone-1 office, Mumbai—Replastering and repainting internally, renewing damaged wooden flooring, renovation of toilet block, open space and strengthening to varandah with allied items."* | रु.३७,९०,३००/- |
| २. | *"Renovation and up-gradation of D.C.P., Zone-1 office, Mumbai—Renovation of leaking Manglore tiled roof, external tuck pointing, renewing external vertical sanitary pipelines with allied items."* | रु.१६,८२,५४०/- |

| अ.क्र.<br>(१) | कामाचे नाव<br>(२) | खर्चाचे अंदाज<br>*(सा.बां. विभाग, मंत्रालयाने सुधारित केलेले)*<br>(३) |
|---|---|---|
| ३. | *"Renovation and up-gradation of D.C.P., Zone-1 office, Mumbai—Renovation of doors and windows with allied items.* | रु.३९,६६,१००/- |
| **एकूण** | | **रु.९४,३८,९४०/-** |

**४.** त्या अनुसार, पोलीस उप आयुक्त, परिमंडळ-१, यांच्या कार्यालयाच्या इमारतीची दुरूस्ती व नूतनीकरण करण्यासाठी, परिच्छेद **३** मधील तक्त्यातील स्तंभ (२) मधील कामे करण्यासाठी स्तंभ (३) मध्ये नमूद केल्याप्रमाणे एकूण रु.९४,३८,९४०/- *(रुपये चौऱ्याण्णव लक्ष, अडतीस हजार, नऊशे चाळीस फक्त)* इतक्या खर्चाच्या अंदाजास, पुढील अटीवर, याद्वारे, प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

१) निधी उपलब्ध झाल्याशिवाय काम सुरू करू नये.

२) खर्चाचे अंदाज हे पोलीस सह आयुक्त (प्रशासन), बृहन्मुंबई, यांनी साक्षांकित करणे आवश्यक आहे.

**५.** उक्त कामासाठी येणारा खर्च हा गृह विभाग--मागणी क्र. बी-१, २०५५, पोलीस, ००, १०८, राज्य मुख्यालय पोलीस, (०२) शहर पोलीस, (०२)(०१) शहर पोलीस-आस्थापना (दत्तमत)(अनिवार्य) (२०५५ ००९७), २७, लहान बांधकामे, याखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**६.** हे ज्ञापन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.५०१/२०१८/इमा-२, दिनांक ०२.११.२०१८, अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** हे ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८११२७११४२००५४२९ असा आहे. हे ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2018.11.27 11:45:21 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**
पोलीस आयुक्त,
बृहन्मुंबई.

**प्रत :-**

१) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडल, मुंबई *(सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी सुधारलेल्या "Abstract" च्या प्रतीसह).*

२) कार्यकारी अभियंता, इलाखा शहर (सा.बां.) विभाग, मुंबई *(सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी सुधारलेल्या "Abstract" च्या प्रतीसह).*

३) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.

४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

५) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.

६) कार्यासन अधिकारी (इमा-२), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

७) कार्यासन अधिकारी (व्यय-७/ विनियम), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

८) निवड फाईल (पोल-७).